**सांगोला शाखा कालवा प्रकल्प, ता.सांगोला,जि.सोलापूर या प्रकल्पाच्या रुपये ९३७.९२ कोटी इतक्या किंमतीस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक: सांगोला ०६१५/प्र.क्र.४०७/१५/मोप्र-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:- २२ जून, २०१७.

<u>संदर्भ</u>:-१) शासन निर्णय क्र. एमएनडी १०७४/५२८/ आयएमजी-२ दि. १४/०९/१९७७.
२) शासन निर्णय क्र. एमआयपी/२०७८/१७२३(१६१२) /जसं-१ आयएमजी-२ दि. २२/०२/१९८०
३) मकृखोविम, पुणे निर्णय क्र.मकृखोविम/सांगोला/ २९६/(१०२/९६)/मोप्र-५/९५८३ दि. ०१/१२/२००३

<u>प्रस्तावना :</u>

ब्रिटिशकालीन नीरा खोरे विकास प्रकल्पामध्ये ( Nira Valley Development Project) येळवंडी (नीरा नदीची उपनदी) नदीवर भाटघर येथे धरण बांधणे, या धरणाच्या खालील बाजूस नीरा नदीवर वीर येथे धरण बांधणे व या धरणापासून नीरा उजवा कालवा व नीरा डावा कालवा बांधून त्याद्वारे पुणे जिल्ह्यातील पुरंदर, बारामती, इंदापूर व सातारा जिल्ह्यातील फलटण, खंडाळा तसेच सोलापूर जिल्ह्यातील माळशिरस, पंढरपूर व सांगोला या तालुक्यातील सिंचनक्षेत्रास लाभ देणे नियोजित होते. तथापि सांगोला तालुक्यातील बहुतांशी क्षेत्रास या प्रकल्पाचा फायदा होत नसल्याने यासाठी नीरा उजव्या कालव्याच्या शेवटी सांगोला शाखा कालवा प्रकल्प नव्याने प्रस्तावित करण्यात आला.

या प्रकल्पाद्वारे सांगोला तालुक्यातील अवर्षणप्रवण ८,७३५ हेक्टर्स सिंचनक्षेत्रास (ICA) नव्याने लाभ देणे प्रस्तावित आहे. तसेच अस्तित्वातील नीरा उजव्या कालव्याच्या किमी १ ते किमी १६९ या लांबीमधील लाभक्षेत्रामध्ये खरीप हंगामात १२००० हेक्टर्स व रब्बी हंगामात ८०० हेक्टर्स अतिरिक्त क्षेत्रास लाभ देणे प्रस्तावित अहे. अशाप्रकारे प्रकल्पाचे एकूण सिंचनक्षेत्र (ICA) २१,५३५ हेक्टर्स आहे. या क्षेत्रासाठी एकूण ११०.९६ दलघमी इतके पाणी आवश्यक असून अस्तित्वातील नीरा उजव्या कालव्याच्या किमी ११५ ते १६९ या लांबीचे तसेच नीरा उजव्या कालव्याच्या शाखा क्रमांक १ (त्यावरील मोठ्या ४ वितरिकांसह) व शाखा क्रमांक ३ (त्यावरील मोठ्या २ वितरिकांसह) चे अस्तरीकरण करून त्याद्वारे होण्या-या बचतीमधून आवश्यक पाणी उपलब्ध होणार आहे.

सदर प्रकल्पास संदर्भ १ अन्वये सन १९७५-७६ चे दरसुचीवर आधारित रु. ०.४६ कोटीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

यानंतर संदर्भ २ अन्वये सन १९७९-१९८० चे दरसुचीवर आधारित रु. १७.१५ कोटीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

यानंतर संदर्भ ३ अन्वये सन २००१-०२ चे दरसुचीवर आधारित रु. २८८.०१ कोटीस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

सदर प्रकल्प हा प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजनेत अंतर्भूत असून मार्च२०२० अखेर पर्यंत पूर्ण करणेचे नियोजन आहे.

द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेनंतर प्रामुख्याने दरसूचीतील दरात वाढ झाल्याने, भूसंपादन खर्चात वाढ झालेने, तसेच संकल्पनातील बदल व द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालातील अपु-या तरतुदी यामुळे प्रकल्प किंमतीत वाढ झाली आहे. त्यामुळे महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने तृतीय सुधारित प्रकल्प अहवाल मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे. या प्रकल्प अहवालास राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने शिफारस केली आहे. तसेच सुधारित प्रकल्प अहवालाबाबत दि. ३१/५/२०१७ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीचे बैठकीत चर्चा झाली आहे.

व्यय अग्रक्रम समितीने वाढीची कारणमिमांसा, राज्य तांत्रिक सल्लागार समितीचा अहवाल, व्यय अग्रक्रम समितीची निरिक्षणे तसेच प्रकल्पातील कामाच्या अनुषंगाने, सातारा जिल्हयातील खंडाळा व फलटण आणि सोलापूर जिल्हयातील माळशिरस, पंढरपूर व सांगोला या तालुक्यांना वरदान ठरणाऱ्या सांगोला शाखा कालवा प्रकल्पाचे काम पूर्णत्वास नेण्याच्या उद्देशाने, सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारित रुपये ९३७.९२ कोटी इतक्या किंमतीच्या तृतीय सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :**

सांगोला शाखा कालवा प्रकल्प, ता. सांगोला जि. सोलापुर या प्रकल्पाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०१३-१४ च्या दरसुचीवर आधारीत रुपये ९३७.९२ कोटी (रुपये नऊशे सदोतीस कोटी ब्यान्नव लक्ष फक्त) इतक्या किंमतीस प्रत्यक्ष कामासाठी रुपये ८५३.२९ कोटी (रुपये आठशे त्रेपन्न कोटी एकोणतीस लक्ष फक्त) व अनुषंगीक खर्च ८४.६२ कोटी (रुपये चौ-याऐंशी कोटी बासष्ठ लक्ष फक्त ) खालील अटींच्या अधीन राहून तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा सोबत जोडला आहे.

१) सांगोला शाखा कालवा प्रकल्पाची उर्वरित कामे सन २०१९-२० पर्यंत पूर्ण करण्यात यावीत.
२) राज्यस्तरिय तांत्रिक सल्लागार समिती -२ च्या मुद्यांची विहीत पद्धतीने पूर्तता करावी.
३) जलसंपदा विभागाच्या दि. ०२ मे २०१७ च्या शासन निर्णयानुसार या प्रकल्पांतर्गतच्या लाभक्षेत्रात सूक्ष्म सिंचनास पूरक वितरण व्यवस्था निर्माण करावयाच्या अनुषंगाने तसेच भूसंपादनाच्या वाढत्या किंमती विचारात घेता प्रकल्पाचा खर्च कमी करण्याच्या दृष्टीने उर्वरित वितरणव्यवस्थेची कामे बंद नलिकेद्वारे करण्याच्या पर्यायाचा क्षेत्रीय स्तरावर विचार व्हावा.
४) प्रकल्पासाठी आवश्यक पाणी नीरा उजवा कालवा कि.मी.११५ ते १६९, त्यावरील शाखा क्र. १ (आणि त्यावरील वितरीका क्र. ४, ९, २१ व २४,) व शाखा क्र. ३ (आणि त्यावरील वितरीका क्र. ३ व ८) यांचे अस्तरीकरण करून वहनव्ययात होणा-या बचतीमधून उपलब्ध होणार आहे. याचा विचार करता या अस्तरीकरणाचे काम त्वरित पूर्ण होणे आवश्यक आहे.

५) उपरोक्त प्रमाणे अस्तरीकरण केल्यावर वहनव्ययात प्रत्यक्ष किती बचत होते याची क्षेत्रीय स्तरावर पडताळणी होणे आवश्यक आहे. अशी कार्यवाही झाल्यानंतर व प्रत्यक्ष पाण्याची किती बचत झाली, याची खात्री करून अद्याप सुरू न केलेली सांगोला शाखा कालव्याच्या किमी ८५ ते १०३ या लांबीमधील कामांची व्याप्ती ठरवावी.

६) नीरा उजव्या कालव्यावरील ५ जलसेतू व ११७ आर्च कल्व्हर्टच्या मजबुतीकरणाची कामे अद्याप हाती घेणे बाकी आहे. त्यानुसार ही कामे करताना या बांधकामांमुळे Afflux च्या परिणामांचा अभ्यास करून या कामांची सविस्तर संकल्पने मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांचेकडून प्राप्त करून घ्यावीत.

७) चालू आर्थिक वर्षात निधी उपलब्धतेच्या अनुषंगाने नियोजन व वित्त विभाग यांच्या सहमतीनंतरच प्रकल्पासाठीच्या कामांची निविदा प्रक्रिया सुरू करण्यात यावी.

८) अतिरिक्त आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.

९) पी- देखभाल या उपशिर्षाखाली रुपये ७.७८ कोटी तरतूद केली आहे. सर्व साधारण देखभालीच्या कामाव्यतिरीक्त अन्य मोठ्या प्रमाणावर दुरूस्ती करावयाची असल्यास अशा कामांना स्वतंत्र प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१०) अधिक दराने निविदा स्वीकारताना सक्षम स्तरावर मान्यता घेतली नसल्यास संबंधितावर जबाबदारी निश्चित करून उचित कार्यवाही करावी.

११) कालव्याची व वितरणप्रणालीची कामे सलगतेने करावीत जेणेकरून जास्तीत जास्त सिंचन निर्मिती होऊन प्रकल्पाचे लाभ मिळतील. कालवा कामाचा व आर्थिक गुंतवणूकीचा वर्षवार कार्यक्रम शासनाकडून मान्य करुन घ्यावा.

१२) संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणीवापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणीवापर संस्थेस हस्तांतरीत करावे.

१३) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वितीकरणाचे विविध टप्प्यावर क्षेत्रिय अधिका-यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रिय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती असे गृहीत धरता येणार नाही.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, (८०)सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०२) योजनांतर्गत, (०२) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (उर्वरित महाराष्ट्र) (संगणक संकेतांक ४७०१ एच-६२९) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय व्यय अग्रक्रम समितीने दिनांक ३१ /०५/२०१७ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६२२१२२९४४०५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2017.06.22 12:26:34 +05'30'

**(श.शं. दाभाडकर)**

**शासनाचे अवर सचिव**

**सहपत्र: परिशिष्ट “अ”**

**प्रत-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.

शासन निर्णय क्रमांक: सांगोला ०६१५/प्र.क्र.४०७/१५/मोप्र-१, दि.२२ जून, २०१७ चे सहपत्र

## परिशिष्ट "अ"
## किंमतीचा उपशीर्ष निहाय गोषवारा

(किंमत रुपये कोटी मध्ये)

| अ. क्र. | उपशीर्ष | मंजूर व्दितीय सुप्रमा नुसार तरतुद | प्रस्तावित तृतीय सुप्रमा नुसार तरतुद | वाढ/घट | मार्च -२०१६ अखेर खर्च | उर्वरीत तरतूद |
|---|---|---|---|---|---|---|
| **अ)** | **शीर्ष कामे** | **निरंक** | | | | |
| **ब)** | **मुख्य कालवे व वितरण व्यवस्था** | | | | | |
| १ | अे-प्राथमिक | ०.५३ | २.७६ | २.२३ | ०.४७ | २.२९ |
| २ | बी- भूसंपादन | ३.९१ | ५०.०५ | ४६.१३ | १.११ | ४८.९४ |
| ३ | सी- कामे | ६७.०७ | १८९.९८ | १२२.९० | ७२.०४ | ११७.९४ |
| ४ | डी- विमोचक | ०.८४ | २.४३ | १.६० | १.२९ | १.१५ |
| ५ | एफ- पारेषण | ५१.११ | ३४३.९५ | २९२.८४ | १०२.०३ | २४१.९२ |
| ६ | जी- पूल | ३.०४ | ११.९४ | ८.९० | २.६१ | ९.३३ |
| ७ | एच- अतिवाहक | ०.१२ | ०.५६ | ०.४४ | ०.२७ | ०.२९ |
| ८ | के- ईमारत | २.८० | ०.२६ | -२.५३ | ०.२६ | ० |
| ९ | एल- मातीकाम | ७६.०७ | १२५.२५ | ४९.१८ | ९३.५५ | ३१.७० |
| १० | एम-वृक्षारोपण | ०.३१ | १.०६ | ०.७५ | ० | १.०६ |
| ११ | ओ-संकीर्ण | १.४३ | ०.६५ | -०.७८ | ०.११ | ०.५४ |
| १२ | पी- देखभाल | १.६३ | ७.७८ | ६.१४ | ०.१३ | ७.६५ |
| १३ | क्यू- हत्यारे व अवजारे | २.२० | ०.१९ | -२.०१ | ०.१९ | ० |
| १४ | आर- - दळणवळण | १.५४ | ०.००३४ | -१.५३६६ | ०.००३४ | ० |
| १५ | यू- वितरीका | १८.१२ | ४४.१६ | २६.०४ | ९.०७ | ३५.१० |
| १६ | व्ही- शेतचारी | ०.६९ | ५९.६० | ५८.९१ | ० | ५९.६० |
| १७ | डब्लू-निचराचारी | १.१५ | १०.७३ | ९.५७ | ० | १०.७३ |
| १८ | वाय- लॉसेस | ०.२० | १.९४ | १.७४ | ० | १.९४ |
| | **एकूण (ब)** | **२३२.७६** | **८५३.२९** | **६२०.५३** | **२८३.१३** | **५७०.१६** |
| **क** | **एकूण कामे (अ+ब)** | **२३२.७६** | **८५३.२९** | **६२०.५३** | **२८३.१३** | **५७०.१६** |
| ड | ETP व इतर | ५५.२५ | ८४.६२ | २९.३७ | १७.३६ | ६७.२६ |
| **इ** | **एकूण (क+ड)** | **२८८.०१** | **९३७.९२** | **६४९.९०** | **३००.४९** | **६३७.४३** |